**औरंगाबाद विमानतळ विकासासाठी मौजे मुकुंदवाडी येथे करण्यात आलेल्या भूसंपादनापोटी सिडको यांना निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र.मविवि-१२१७/४/प्र.क्र.१०३/ २८-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ३२.
दि. २३ जानेवारी, २०१९

**वाचा :** व्यवस्थापकीय संचालक, सिडको, मुंबई यांचे पत्र क्र. सिडको/व्य.सं./नवि मुंबई/ २०१६, दि. ऑगस्ट, २०१६.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम ४० (१) (ब) अन्वये शासनाने सिडकोची नवीन औरंगाबाद प्रकल्पाकरीता विशेष नियोजन प्राधिकरण म्हणून नियुक्ती केली आहे. औरंगाबाद विमानतळ विस्तारीकरण प्रकल्पामध्ये नवीन औरंगाबाद प्रकल्पाच्या अधिसूचित क्षेत्रातील मौजे मुर्तीजापूर येथील १४.१४ हे. आर व मौजे मुकुंदवाडी येथील ३०.८९ हे. आर. मिळून एकूण ४५.०३ हे. आर. संपादित जमिनीचा समावेश आहे. त्यापैकी मौजे मुकुंदवाडी येथील ३०.८९ हे.आर. जमिनीचे भूसंपादन सिडकोने केले असून मूळ भूसंपादन निवाड्यानुसार रु.४०,००,०००/- मावेजा रक्कम सिडको यांनी भरले आहेत. तथापि, या क्षेत्रातील भूधारकांनी भूसंपादन अधिनियम १८९४ च्या कलम १८ अन्वये वाढीव मावेजा रक्कम मिळण्याबाबत मा. जिल्हा न्यायालयात एकूण २२ दावे दाखल केले. त्यापैकी ८ प्रकरणांमध्ये मावेजा रक्कम सिडको यांनी व १४ प्रकरणांमध्ये मावेजा रक्कम भारतीय विमानपत्तन प्राधिकरण यांनी भरावी, असे आदेश जिल्हा न्यायालयाने दिले आहेत. एकूण २२ प्रकरणांपैकी उर्वरित १४ प्रकरणातील वाढीव मावेजा रक्कम विमानपत्तन प्राधिकरण यांनी द्यावी, असा निर्णय जिल्हा न्यायालयाने दिला असला तरी सदर प्रकरणांची जबाबदारी विमानपत्तन प्राधिकरण यांच्या वतीने शासनाची असल्याने जप्तीची घटना टाळण्यासाठी या प्रकरणातील वाढीव मावेजा रु.७,७५,६५,९८४/- या एकूण रकमेच्या ७५ टक्के रक्कम सिडकोने भरावी अशी जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांनी दिनांक १३/०४/२०११ च्या पत्रान्वये विनंती केली होती. उपरोक्त प्रकरणी मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २० जानेवारी, २०११ रोजी झालेल्या बैठकीमध्ये सिडकोने संपादित केलेल्या जमिनीबाबत मोबदला व भूसंपादनाबाबत वाढीव मोबदला देण्याची कार्यवाही सिडकोनेच करावी असे निर्देश देण्यात आले आहेत.

सिडको यांनी मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार वाढीव मावेजा रक्कम रु.७,७५,६५,९८४/- च्या ७५% रक्कम रु.५,८१,७४,४८९/- रक्कम भरुन जिल्हा न्यायालयाचे स्थगिती आदेश मिळविले आहेत. सिडकोच्या संचालक मंडळाने या भूसंपादनासाठी मूळ निवाडयानुसार भूधारकांना दिलेली रक्कम रु.४०,००,०००/- व न्यायालयात वाढीव मावेजाबाबत

भरावयाची रु. ७,७५,६५,९८४/- मिळून एकुण रु. ८,१५,६५,९८४/- रकमेची शासनाकडे मागणी करण्याचा ठराव मंजूर केला असून त्याअनुषंगाने प्रस्ताव शासनास सादर केला होता. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

औरंगाबाद विमानतळ विकास प्रकल्पातील मौजे मुकुंदवाडी येथील ३०.८९ हे.आर जमिनीचे भूसंपादनासाठी जमीन मालकांना यापूर्वी अदा केलेली मूळ निवाडा रक्कम रु. ४०.०० लाख तसेच जमीन मालकांना वाढीव मावेजा रक्कम देण्याबाबत रु. ७,७५,६५,९८४/- अशी एकूण **रु. ८,१५,६५,९८४/- ( रुपये आठ कोटी पंधरा लाख पासष्ट हजार नऊशे चौऱ्याऐंशी फक्त)** रकमेची प्रतिपूर्ती सिडको यांना करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. या बाबतचा होणारा खर्च मागणी क्रमांक एन-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य, राज्य योजना (००) (०२) विमानतळाच्या विकासाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान (३०५३ ०१६४) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा, व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. याबाबत उपसंचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे. त्यांनी उपरोक्तप्रमाणे झालेल्या खर्चाचा अहवाल व खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र या विभागास तसेच महालेखापाल कार्यालयास सादर करण्यात यावे.

४. सदरहू शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. ४९४/२०१८/व्यय-४, दि.१८.१२.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१९०१२३१४५१५६५२०७ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Sandhya Ashok Bageshwar

Digitally signed by Sandhya Ashok Bageshwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d4a8d57e69da6499480bc974f18dca56ad5541c4795df9434c3e826318ec8ea, serialNumber=ba5a637883d7b445558182d1fd79c7e47a2d65e5094f71fb0ec8c5d23b0cc880, cn=Sandhya Ashok Bageshwar
Date: 2019.01.23 15:00:47 +05'30'

**(सं.अ.बागेश्वर)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत ,**

१. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

२. मा.राज्यपाल यांचे परिसहायक, राजभवन, मुंबई.

३. महालेखापाल, ( लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
५. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या.२५), मंत्रालय, मुंबई
६. उप संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई
७. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई
८. व्यवस्थापकीय संचालक, शहर व औद्योगिक विकास महामंडळ महाराष्ट्र मर्या., मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११. उपसचिव (व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. उपसचिव (कार्या-१४४३), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. सामान्य प्रशासन विभाग / कार्या.२५, मंत्रालय, मुंबई
१४. निवड नस्ती.